कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस, ऊस) सन २०२०-२१ चा अखर्चित ₹२०.४५ लाख निधी पुनर्जिवित करून सन २०२१-२२ मध्ये अभियानांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी विनियोगात आणण्यास मान्यता प्रदान करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राअसु-२०२२/प्र.क्र.१०/४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०२२

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण/२०१७-प्र.क्र.३१/१७-अे, दि .१९/०४/२०१७.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि.१४/०६/२०२१
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसु-२०२१/प्र.क्र.३९/४-अे, दि.२२/०६/२०२१
५. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि. ०५/०१/२०२२
६. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र३/रा.अ.सु.अ.कापूस/अनु./६२०/२२, दि.०६/०१/२०२२
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.१८/ अर्थसंकल्प (विघयो), दि.२१/०३/२०२२
८. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसु-२०२२/प्र.क्र.०४/४-अे, दि.२४/०३/२०२२
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.२६/ अर्थसंकल्प (विघयो), दि.२३/०३/२०२२

**प्रस्तावना:-**

सन २०२१-२२ करीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) ₹७३९.०० लाख निधीच्या कृती आराखडयास (केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० प्रमाणात) केंद्र शासनाच्या संदर्भाकित दि.१४/०६/२०२१ च्या पत्रान्वये दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने सदर कृती आराखडयास संदर्भाकित दि.२२/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

सन २०२१-२२ मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी ₹१८.८३ लाख ( केंद्र हिस्सा रु.११.३० लाख निधी + राज्य हिस्सा ₹७.५३ लाख ) निधी यापूर्वी संदर्भाकित दि.२४ /०३/२०२२ च्या शासन निर्णयान्वये कृषि आयुक्तालयास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत केला आहे.

केंद्र शासनाने संदर्भांकित दि.०५/०१/२०२२ च्या पत्रान्वये अंतरिम उपयोगीता प्रमाणपत्राच्या आधारे सन २०२०-२१ चा अखर्चित असलेला केंद्र हिश्श्याचा एकूण ₹ १७५.४९ लाख निधी पुनर्जिवित करुन सन २०२१-२२ मध्ये विनियोगात आणण्यास मंजूरी दिली आहे. त्यापैकी राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी ₹ २०.४५ लाख निधी ( केंद्र हिस्सा रु.१२.२७ लाख निधी + राज्य हिस्सा ₹ ८.१८ लाख ) अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करणे आवश्यक आहे. अखर्चित निधीपैकी अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹ ५४.९२ लाख निधी (केंद्र रु. ३२.७५ लाख + राज्य ₹ २२.१७ लाख) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाच्या PFMS संलग्न बँक खात्यावर शिल्लक आहे. PFMS खात्यावरील रक्कम रु.५४.९२ लाख खर्च करण्यास कृषि आयुक्तालयास दि.२७/०१/२०२२ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. सबब, अनुसूचित जाती प्रवर्गाचा एकूण अखर्चित निधी पैकी ₹ २०.४५ लाख निधी पुढीलप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**(रु.लाख)**

| **अ.क्र.** | **वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस)** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | **एकूण एकंदर** |
|---|---|---|---|---|
| १ | कापूस | ४.०८ | २.७२ | **६.८०** |
| २ | ऊस | ८.१९ | ५.४६ | **१३.६५** |
| | **एकूण** | **१२.२७** | **८.१८** | **२०.४५** |

वरीलप्रमाणे वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी अखर्चित निधीपैकी शासन स्तरावर उपलब्ध असलेल्या केंद्र हिश्श्याच्या ₹ १२.२७ लाख निधीचे व समरुप राज्य हिश्श्याच्या ₹ ८.१८ लाख निधीचे वितरण करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस ) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी प्राप्त केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी अखर्चित असलेला केंद्र हिश्श्याचा ₹ १२.२७ लाख केंद्र व राज्य हिश्श्याचा ₹ ८.१८ लाख असा एकूण ₹ २०.४५ लाख निधी ( रुपये वीस लाख पंचेचाळीस हजार फक्त) पुनर्जिवित करुन सन २०२१-२२ मध्ये सदर अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस,ऊस) सन २०२०-२१ मधील प्रलंबित दायित्व अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे .

२. परिच्छेद १ मध्ये नमूद ₹ २०.४५ लाख निधीपैकी वाणिज्यिक पिके ( कापूस ) करिता केंद्र हिस्स्याचा ₹४.०८ लाख निधी (रुपये चार लाख आठ हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ २.७२ लाख निधी ( रुपये दोन लाख बहात्तर हजार फक्त) असा एकूण ₹ ६.८० लक्ष निधी ( रुपये सहा लाख ऐंशी हजार फक्त) वितरीत करण्यात येत आहे .

३. परिच्छेद १ मध्ये नमूद ₹ २०. ४५ लाख निधीपैकी वाणिज्यिक पिके ( ऊस ) करिता केंद्र हिस्स्याचा ₹ ८.१९ लाख निधी (रुपये आठ लाख एकोणीस हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ ५.४६ लाख निधी ( रुपये पाच लाख सेहेचाळीस हजार फक्त ) असा एकूण ₹ १३.६५ लाख निधी ( रुपये तेरा लाख पासष्ट हजार फक्त ) वितरीत करण्यात येत आहे.

४. परिच्छेद १ ते ३ मध्ये नमूद केल्यानुसार कापूस, ऊस पिकांकरिता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत केलेला निधी सन २०२१-२२ मध्ये पुढील लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

| केंद्र/ राज्य हिस्सा | लेखशिर्ष अनुसूचित जाती प्रवर्ग | |
|---|---|---|
| | **कापूस** | **ऊस** |
| **केंद्र हिस्सा** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१ पीक संवर्धन (१०८) वाणीज्यिक पिके (००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०७) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान कापुस, केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ बी १४१) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१ पीक संवर्धन (१०८) वाणीज्यिक पिके (००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान ऊस, केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०१ बी १२३) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य |
| **राज्य हिस्सा** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१ पीक संवर्धन (१०८) वाणीज्यिक पिके (००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०८) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान कापुस, केंद्र पुरस्कृत योजना, (राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ बी १५२) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१ पीक संवर्धन (१०८) वाणीज्यिक पिके (००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान ऊस, केंद्र पुरस्कृत योजना, (राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ बी १३२) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य |

५. सन २०२१-२२ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

६. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹२०.४५ लाख निधी करिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर जिल्हा निहाय खर्चाची मर्यादा निश्चित करावी.

९. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ. क्र.४ येथील दि.२२/०६/२०२१ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

१०. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र.२६/ अर्थसंकल्प (विघयो), दि.२३/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचे सांकेतांक २०२२०३२५१८३६५९८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.03.25 18:38:32 +05'30'

**(महेंद्र घाडगे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१२. सर्व कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१६. सह संचालक लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१८. महालेखाकार (स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा ), प्रतिष्ठा भवन ,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१९. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
२०. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई - ३२
२१. निवडनस्ती (कार्यासन-४अे).